नवनाथ भक्तिसार    अध्याय एकतीसावा

श्रीदत्त आश्रमातून गोरक्षनाथ गेल्यानंतर श्रीदत्तगुरूंनी नाथपंथीयासाठी आवश्यक असलेल्या सर्वच शस्त्र अस्त्र विद्या आणि कलांमध्ये भर्तरीला पारंगत केले आणि त्याला बद्रिकाश्रमात नाग अश्वत्थ् वृक्षाची आराधना आणि तपश्चर्येसाठी बसवून गिरनार पर्वतावर परतले आणि मच्छिंद्रनाथांची वाट पहात थांबले. मच्छिंद्रनाथ आणि गोरक्षनाथ श्रीदत्तगुरूंच्या भेटीसाठी निघाले असतां त्यांना कौंडीप्यपुरी नगरीच्या मध्यवर्ती चौकात हात पाय तोडून मरणासन्न अवस्थेत फेकलेला युवक शेवटचे आचके देत असतांना दिसला. चौकशी करता असे कळले की त्या नगरीच्या शशांगर राजाचा हा पुत्र असून ही घोर शिक्षा साक्षात पित्यानेच दिली आहे. मानवतेच्या दृष्टीकोनातून त्यांस मदत करावी हा विचार त्यांनी केला पण दरम्यानच्या काळात कलीप्तापेक्षाही अद्भुत अशा सत्याला त्यांना सामोरे जावे लागले. वस्तुस्थितीचा मागोवा घेताना त्यांना जे काही ज्ञात झाले त्यापेक्षा पुढे काय होणार हेच म्हत्वाचे अन् अद्भुतरम्य वाचावयास मिळणार आहे.

भुजावंतीचा मनस्ताप, पश्चाताप आणि भयभीत अवस्था पाहून तिची खास जिवलग दासी भुजावंतीला शहाजोगपणे सल्ला देते, “महाराणी! ईश्वराने जे काही भाग्यात लिहिले असेल तसेच घडून येईल. त्यामुळे व्यर्थ काळजी करण्याचे कारण नाही. अशा प्रसंगी शांत चित्ताने विचार करणे आवश्यक आहे. मी एक युक्ती सांगते तसे करावे. आता आपल्या महालात जाऊन झोपावे. महाराज शिकारीवरून आल्याबरोबर तुमच्या महालात येतील पण तुम्ही मात्र अजिबात उठू नका, झोपूनच रहा, महाराजांनी विचारल्यावर रडण्याचे नाटक करा, डोळयांतून भरपूर अश्रू काढून सांगा, “महाराज माझा जीव उडून गेला आहे. मला जगवसे वाटत नाही, अब्रू गेल्यानंतर जगण्यात तरी काय मतलब आहे?” असे काही ऐकून महाराज विचारतील, तेव्हा सांगावे, “तुमचा पुत्र कृष्णागर, माझ्या महालात आला आणि माझी अब्रू लुटण्याचा प्रयत्न केला. मी कशी बशी सुटका करून घेतली. मी महाराणी असून माझ्याच अब्रूवर घाला होत असेल तर मृत्यु काय वाईट?” अशा प्रकारे, युक्तिपूर्वक महाराजांना क्रोधीत करावे. राजा संतापाने बेभान झाल्यावर पुत्राचेच निर्दालन करील. मग चिंता कसली? सुखाने नांदावे, विषबाधा होण्यापूर्वीच विषारी वृक्ष समुळ उपटून काढावे. धोका संपतो. सर्पाचा फणा आणि विंचवाची नांगी ठेचल्यावर दंश होणार नाही. अग्नी लघु रुपात असतांनाच पाण्याने विझवावे म्हणजे घर सुरक्षित राहते. तुमच्या काळजात सुलणारा कृष्णागर नावाचा वेदना देणारा काटा राजाच्या क्रोधाग्नीत जाळून टाकावा. हातपाय गाळून नुसत्या रडू नका, त्या रडण्याचा उपयोग महाराजांच्या क्रोध निर्मितीसाठी करावा. अश्रू हे विधात्याने स्त्रीला बहाल केलेले मोहनास्त्र आहे. त्याचा प्रताप पहा तरी!” दासीच्या कल्पकतेपुढे भुजावंती थक्क झाली. तिच्या सल्ल्यानुसार पुढील नाटक सुरु झाले.

अन्नपाणी वर्जित करून भुजावंती मंचकावर पडून आहे, स्नान, साजशृंगार केला नाही. भाळावर कुंकुम लावले नाही. केस मोकळे सोडून विस्कटलेले आहेत. पालथी पडून तोंड खुपसून रडत आहे. डोळे मुद्दाम चोळून चोळून लालबुंद केलेले आहेत. कुणाशीही बातचीत नाही. नुसती स्फुंदून स्फुंदून रडत आहे. शशांगर राजा शिकारीहून आला पण आपल्या स्वागतासाठी लाडकी राणी समोर न आल्याने त्याने दासीला विचारले, “आम्ही शिकारीहून परतलो आहोत तरी आम्हाला ओवाळून लिंबलोण उतरण्यासाठी महाराणी भुजावंती का आल्या नाहीत? शाही रीतीरिवाजांचा विसर तर पडला नाही ना?

“तसे नाही महाराज! त्या रीतीरिवाज कसे विसरतील? परंतु कोण जाणे त्या कसल्या तरी दुःखात आहेत, काही सांगत नाहीत, महालात पडून सारख्या रडत आहेत.” दासी म्हणाली. ते ऐकून राजा त्वरेने भुजावंतीच्या महालात गेला. तिचा तो अस्ताव्यस्त अवतार पाहून विचारू लागला, “प्रिये! झोपून का राहिलीस?” तिने राजाला काहीच उत्तर दिले नाही पण जोरजोरात हुंदके देत रडू लागली नेत्रांतून अश्रुपात सुरु झाला. ते पाहून राजा पार विरघळला. मंचकावर तिच्या शेजारी बसला, तिला जवळ ओढून मांडीवर घातले, छातीशी धरून तिचे अश्रू स्वहस्ते पुसत लाडीकपणे विचारले, “काय झाले प्रिये! मला सांग...” तुला कुणी दुखावले? तुझ्या सुखसरीतेत दुःखाचे गढूळ पाणी कोणी मिसळले? मी तर इथला राजा आहे. मी इतरांचा न्यायनिवाडा करतो, ज्याचे माप त्याच्या पदरात घालून गुन्हेगारांना शासन करतो आणि इथे तर प्रत्यक्ष महाराणी शोक करीत आहे. तुला दुःख देणारा कुणी नर असो अथवा नारी! मी त्याला यमलोकी धाडीन. तुझा अवमान म्हणजे माझा ही अवमान आहे. तुझा अवमान करणाऱ्याने एक प्रकारे माझ्या शक्तीला आव्हानच केले आहे. क्षुद्र कोल्हया, कुत्र्यांनी सिंहाच्या छाव्याला त्रास द्यावा म्हणजे काय? मला नाव सांग त्याचे. त्याचा शिरच्छेद केला जाईल.”

भुजावंती रडत हुंदके देत सांगू लागली, “प्राणनाथ, आपण शिकारीला गेल्याची संधी साधून, आपल्या गैर हजेरीत साक्षात आपला पुत्र कृष्णागर कामवासनेच्या इराद्याने माझ्या महालात आला आणि मी एकटीच आहे असे पाहून माझा हात धरून निर्दयपणे मला मंचाकाकडे ओढू लागला. प्रणयसुखाची मागणी करीत मला मिठ्या मारू लागला. त्याची बळजबरी पाहून मी घाबरले. सर्व शक्ती एकवटून त्याच्या मिठीतून स्वतःला सोडविले. हात हिसकून घेतला आणि पळत सुटले. पळता पळता कोलमडून पडले. पुन्हा उठून तशीच आतल्या महालात जाऊन आतून दार बंद केले म्हणून बचावले. तेव्हा नाईलाजाने तो नराधम निघून गेला. परमेश्वराची कृपा म्हणून शील वाचले. अन्यथा अब्रूची बेअब्रू होऊन तोंड काळे झाले असते. घरातच असला लिंगपिसाट राक्षस असल्याने आज ना उद्या तो माझी शिकार करणारच. महाराज! मला जगण्याची इच्छा नाही. केवळ आपल्या दर्शनासाठी प्राण रोखून धरला होता. तुमच्या दर्शनाने मन संतुष्ट झाले. आता मला निरोप द्या, मी सुखाने मरू इच्छिते.” हे ऐकून शशांगरचा क्रोध नव्हे तर क्रोधाचा आगडोंब उसळला. डोळयांत अंगार पेटला. डोळयांत रक्त उतरून डोळे लालबुंद झाले. विजेचा झटका बसावा तसा ताडकन उठून तो बाहेर आला आणि टाळी वाजवून आवाज दिला, “कोण आहे रे तिकडे?, त्वरित सामोरे यावे.” आवाजातील जरब ऐकून शास्त्रधारी सैनिक धावत आले. त्यांना हुकुम देण्यात आला, “याच पाऊली, आताच्या आता जा आणि राजकुमार कृष्णागराची होळी करा, किंवा त्याच्या हातापायांची खांडोळी करा. जा!” हुकुमाचे ताबेदार सैनिक धावत गेले आणि कृष्णागराच्या महालाला वेढा घातला. शस्त्रे उपसली. तळपणाऱ्या नंग्या शस्त्रांनी राजकुमार वेढला गेला. हत्यारबंद पहाऱ्यात शिक्षागृहाकडे त्याला नेण्यात आले पण निरागस चेहऱ्याच्या राजपुत्रावर उपसलेली शस्त्रे चालविण्यास सैनिकांचे मन धजेना. महाराजांनी हुकुम देण्यात काही गफलत तर केली नाही नां, हे चाचपून पाहण्यासाठी एक सैनिक धावत राजाकडे गेला आणि मुजरा करून सांगू लागला, “महाराज, कृष्णागराला शिक्षागृहात नेला आहे...” त्याचे बोलणे पुरते ऐकून न घेता राजा उसळून म्हणाला, “त्याच्या हातापायांची खांडोळी करा.” घाबरून सैनिक पळत सुटला. राजाचा राग शांत झाला असावा ह्या कल्पनेने पुन्हा दुसरा सैनिक गेला असतां, राजाने तोच हुकुम दिला. शस्त्र चालविण्यास हात उचलत नव्हते परंतु राजाकडून पुन्हा पुन्हा तोच आदेश प्राप्त होत होता, मन कठोर करून त्यांनी राजकुमाराला

चौरंगावर बसविला. दोरखंडाने हात पाय बांधले. शस्त्रांचा वार करण्यापूर्वी हुकुमात बदल होईल, या वेड्या आशेवर ते विलंब करीत होते.

या घटनेचा बाहेर बोभाटा झाल्यामुळे लोकांत कुजबुज सुरु झाली होती. काही विचारवंत आणि ज्येष्ठ प्रतिष्ठित मंडळी राजाची समजूत घालण्यासाठी गेले असतां, राजाचा उग्र अवतार पाहून त्यांचे बोलण्याचे धाडसही झाले नाही. शेवटची आशा ही संपली. हताश अवस्था झाल्येल्या सैनिकांनी काळजावर दगड ठेवून शस्त्रांचे घाव घातले. हात पाय धडा पासून वेगळे झाल्यामुळे लुळा पांगळा झालेल्या कृष्णागराला राजाज्ञेप्रमाणे त्याच्या तुटक्या अवयवांसह नगरीच्या चव्हाट्यावर फेकून देण्यात आले. त्याची अवस्था पाहून सर्व नागरिक भयभीत झाले. कुणीही त्याच्याजवळ जाण्यास तयार नव्हता. त्याच्या हातपाय विरहित देहातून रक्ताचे पाट वाहत होते. सुकुमार कृष्णागर मूर्च्छित होऊन मेल्यासारखा निपचित होऊन पडला आहे. तोंडातून फेस येऊन डोळे पांढरे झाले आहेत. राजाच्या भयाने कुणी त्याच्या मुखांत पाणीसुद्धा घालत नव्हते. आजूबाजूला लपत छपत पाहणारे नगरवासी आपापसांत कुजबुजत आहेत, “अरेरे! कृष्णागरासारखी दैवी मूर्ती राजाने भंग केली, हे बरे नाही झाले.

“अहो, राजाला म्हातारचळ लागला आहे. बुद्धी भ्रष्ट झाली आहे म्हणून तर अशा देवअवतारी पुत्राचे हे असे हाल केले. असल्या बुद्धीभ्रष्ट आणि निर्दयी राजाच्या राज्यात राहणे उचित नाही. चूक कुणाकडून होत नाही? कदाचित चुकले असेल असे गृहीत धरू, म्हणून काय एवढी क्रूर शिक्षा करावी? अहो! माणूस हा चुकणारच, आपल्या हातूनसुद्धा एखादी नकळत चूक झाली तर राजा असे अघोरी शासन करेल. एकुलत्या एका पुत्रासाठी ज्याचे काळीज द्रवले नाही तो प्रजेवर काय मायेचे छत्र धरणार? हा तर राक्षसीपणा आहे.” “तसे नाही राव! राज्य चालवणे बोलण्याएवढे सोपे नाही. या उदाहरणातून राजाची न्याय निष्ठुरता दिसून येते. तो एवढा कर्तव्यकठोर आहे की प्रसंग आल्यास तो स्वकीयांची सुद्धा गय करीत नाही. यामुळे प्रेजेतील दुराचारी समाजकंटकांना धाक बसेल.” “होय हो! बरोबर आहे. कृष्णगराने मातेवर वाईट नजर ठेवली म्हणून त्याला ही शिक्षा झाली. त्यांत राजाची काही चूक नाही. नरभक्षक वाघाला अथवा विषारी विंचवाला शासन करणे हे आवश्यक समजले जाते. राजाने राजधर्माचे पालन केले आहे.” अशा प्रकारे अनेकांची अनेक तोंडे, मारणाऱ्याचा हात धरता येतो परंतु बोलणाऱ्याचे तोंड धरता येत नाही.

तर भिक्षा मागत असतांना, मच्छिंद्र गोरक्ष त्या चव्हाट्यावर येऊन ते करूण दृश्य पाहत होते. तसेच भेदरून गेलेल्या नगरवासीयांची बाष्कळ बडबड ऐकत होते. अर्धमेल्या राजकुमाराला पाहून दयाळू नाथ कळवळले. त्यांनी क्षणभरासाठी योगमुद्रा स्थिर ठेवून दिव्य दृष्टीने पहिले असतां त्यांना ‘कृष्णागर अवतारी असल्याचे जाणवले. तसेच तो निष्पाप, निर्दोष असून त्याच्या सावत्र मातेने स्वतःचे दुष्कृत दडवण्यासाठी त्याच्या विरुद्ध कुभांड रचल्याचेही आकलन झाले पण बुद्धिभ्रष्ट, विषयलोभी राजाने कांतेच्या शब्दांची बिलकुल शहानिशा न करता शिक्षा करून मोकळा झाला होता. असला अन्यायी राजा पृथ्वीला भार आहे. बाईलबुद्धीने पुत्राचा घात केला.’ अशी सत्यस्थिती समजल्यावर गोरक्षनाथ म्हणाले, “गुरुदेव! या कृष्णागराचे नाव प्रसिद्धीस आणावे. चौरंगावर याचे हात पाय खंडित होऊन हा चव्हाट्यावर पडला असल्याने यांस ‘चौरंगी’ नावाने अमर करावे. चला! आपण राजाकडून याला मागून घेऊ.” त्यावर मच्छिंद्रनाथ म्हणाले, “गोरक्षा, आधी राजा राणीला शिक्षा करून अद्दल घडवून मग शिवपुत्र चौरंगीला नेऊ या.”

“नको महारज! आधी चौरंगीला नेऊन नाथपंथात समाविष्ट करू विद्या पारंगत करून मग त्याच्याच हस्ते राजा आणि त्या कुलटेला शिक्षा देऊ या.” अशी पुस्ती गोराक्षांनी जोडली. त्यावर “ठीक आहे! गोरक्षा तुझा विचारही योग्य आहे.” असे नाथ म्हणाले. मग त्या दोघा महातपस्वींनी द्वारपालाद्वारे शशांगर राजाला मच्छिंद्र आणि गोरक्ष भेटावयास आल्याचा निरोप पाठविला. राजाने त्यांना विनाविलंब भेट दिली. त्यांचे स्वागत करून म्हणाला, “आपणासारखे तपस्वी योगी केवळ आम्हालाच नव्हे तर हरि आणि हर यांनासुद्धा वंदनीय आहांत. माझ्या सुदैवाने आज मला आपल्या दर्शनाचा लाभ झाला.” असे म्हणून चरणांवर माथा ठेवून वंदन केले. उभयतांना आसनावर बसवून यथोचित पूजन केले आणि हात जोडून म्हणाला, “ महाराज! आजपर्यंत आपली कीर्ती ऐकून होतो, आज सेवा करण्याचे भाग्य लाभले आज्ञा करावी. काय हुकुम आहे? शशांगर आपला दास होऊन आपल्या सेवेसाठी हजर आहे.

“राजन! आपल्या नगरीत चव्हाट्यावर हातपाय तोडण्याची शिक्षा झालेला तरूण पडला आहे. तो तुमचा गुन्हेगार आहे परंतु शिक्षेची अंमलबजावणी झाली असल्याने तो आम्हास देऊन टाकावा.” राजा खळखळून हस्त म्हणाला, “समर्थ योगीराज, काय कराल त्या लुळया पांगळयाचे? तो तुमच्या काही उपयोगाचा राहिलेला नाही. चालू शकत नाही की हलू शकत नाही. तुम्हालाच त्याला खांद्यावर घेऊन घेऊन वागवावा लागेल. त्याने तुमची सेवा करण्या ऐवजी तुम्हालाच त्याची सेवा चाकरी करावी लागले.

“तो जसा आहे तसा आम्हाला पाहिजे. देणार की नाही तेवढे सांगा!” त्यावर “साधू महाराज, मी नाही कशाला म्हणेन? खुशाल घेऊन जा. माझी काही हरकत नाही. खरं तर मला त्याची स्मृती आणि दर्शन सुद्धा नको आहे.” असे राजा म्हणाला.

शशांगर राजाची संमती मिळाल्यावर चौरंगीजवळ उभय नाथ आले. गोरक्षनाथांनी त्याला तशाच जखमी अवस्थेत उचलून खांद्यावर घेतला. मच्छिंद्रनाथांनी तुटके अवयव उचलले. बेशुद्धीत असलेल्या चौरंगीच्या तोंडातून गळणाऱ्या फेसातून आणि जखमांतून ओघळलेल्या रक्तधारांनी जमिनीवरील मातीत रेघोट्या उमटू लागल्या. त्याला स्वतःच्या मुक्कामी आणल्यानंतर त्याच्या जखमांवर प्राथमिक उपचार केले. त्याच्या जखमा स्वच्छ केल्या. येथे ग्रंथकारांनी भक्तांच्या आणि श्रोत्यांच्या मनात निर्माण होणाऱ्या एका धार्मिक शंकेचे स्पष्टीकरणही केले आहे. “या दोन्ही सामर्थ्यशाली नाथांकडे निर्जीवात्वून सजीव करण्याची क्षमता आणि शक्ती असतांना, त्यांनी योग शक्तीने चौरंगीच्या जखमां का बऱ्या केल्या नाहीत? किंवा नवीन हस्तपादांची निर्मिती का केली नाही? सामान्य जनांप्रमाणे जखमांवर प्राथमिक उपचार वा मलमपट्टी करण्याची काय गरज होती? यावर महाकवीचा खुलासा असा की “भविष्य काळाच्या गर्भात काही अलौकिक निर्मिती होणार असल्याचे नाथांनी जाणले होते. त्यामुळे तूर्त वेदना शमविण्यासाठी नाथांनी हा तात्पुरता उपाय केला आहे.”

दुसऱ्या दिवशी गोरक्षनाथांनी चौरंगीला खांद्यावर घेतला, मच्छिंद्रनाथांसमवेत वायुवेगाने बद्रीकाश्रमांत येऊन पोहोचले. शिवालयात जाऊन बद्रीकेदाराचे दर्शन घेतले. चौरंगीला मंदिरात बसवून दोघे अरण्यात गेले. एक उत्तम गुहा शोधली. तिचे प्रवेशद्वार लहान परंतु आत मोठा विस्तार होता. या गुहेत चौरंगीला ठेवण्याचे ठरले. गोरक्षनाथांनी एक मोठी शिळा आणून ती द्वारावर बसवून पहिली. ही शिळा द्वारावर बसविल्यास गुहेत अंधार होऊन एकांत आणि सुरक्षितपणा लाभण्याची निश्चिती होती. याप्रकारे व्यवस्था करून उभय नाथ पुन्हा शिवालयात परतले. चौरंगीला घेऊन

गुहेजवळ गेले. गुहाद्वाराच्याजवळ असलेल्या वृक्षाखाली बसून विश्रांती घेत असताना गुरु मच्छिंद्रनाथ म्हणाले, “गोरक्षा! चौरंगीला येथेच अनुग्रह द्यावास.” त्यावर गोरक्ष म्हणाले, “गुरुजी तपश्चर्येशिवाय माझा अनुग्रह लाभणार नाही. तरी प्रथम याला अनुष्ठानाला बसवून तपाची पूर्तता करू आणि मग मी याला अनुग्रह देईन.” “ठीक आहे वत्सा! याला इथेच तपाला बसव.” मग चौरंगीकडे वळून विचारले, “पुत्रा चौरंगी, या गुहेत तपाला बसणार का?”

चौरंगी म्हणाला, “गुरुमाऊली! आपण माझ्या प्राणांचे रक्षण केले आहे आपले माझ्यावर अनंत उपकार आहेत, आपण म्हणाल ते मला मान्य आहे. फक्त एकच मागणे आहे. मी हा असा अपंग, आपण कुठेही गेलात तरी कुर्मदृष्टीने माझे रक्षण करावे, मला विसरू नये, एवढे दान मला देण्याची कृपा करावी.” चौरंगीचा होकार आणि गाढ श्रद्धा पाहून नाथांना आनंद झाला. त्याला गुहेत ठेवून सांगितले, “चौरंगी, या वरच्या शिळेकडे लक्ष ठेव. ती सुटून पडण्याची शक्यता नाकारता येत नाही. त्यामुळे एक टक तिच्याकडे लक्ष ठेवून पाहत राहावे, नजर हटविलीस तर शिळा कोसळून धोका होईल. आमचे वरदान तुझ्या सोबत आहेच. तरी सुद्धा आम्ही सांगतो त्या मंत्राचा जप करीत राहावे. म्हणजे प्राण रक्षण होईल. तुझे तप खचितच पूर्ण होईल.” मग गोरक्षनाथांनी त्याच्या कानात एक मंत्र सांगितला. अरण्यातून उत्तम फळे आणून त्याला खाऊ घातली. निघण्यापूर्वी पुन्हा एकदा बजावून सांगितले, “त्या शिळे वरून दृष्टी हटवू नकोस. मंत्र जप विसरू नये. फलाहार करून राहावे. दृढ निश्चयाने तप करावे. आम्ही तीर्थयात्रा करून तुझ्या भेटीसाठी परत येणार आहोत.”

निरोप घेऊन उभय नाथ बाहेर आले. गोरक्षनाथांनी शिळा बसवून गुहाद्वार बंद केले. चामुंडांचे स्मरण करताच त्या प्रकट झाल्या. त्यांना सांगितले, “माझा प्राण चौरंगी या गुहेत तपाला बसला आहे. अरण्यातून रोज उत्तम फळे आणून गुप्तपणे त्याच्यापुढे ठेवावीत, शिळी फळे, कचरा बाहेर टाकून स्वच्छता राखावी.” अशा प्रकारे चौरंगीच्या सेवेसाठी गुप्त चामुंडा ठेवून उभय नाथ गिरनार पर्वताकडे मार्गस्थ झाले. शिळेवर दृष्टी रोखून चौरंगी मुखाने जप करू लागला. शिळा कोसळण्याच्या भितीने तो नजर हटवत नव्हताच परंतु अंगाचीसुद्धा हालचाल करत नव्हता. जीवाच्या भयाने भूक तहान विसरून गेला. हात पाय नसल्याने फळे खाऊ शकत नव्हता, वाकून तोंडाने उचलावे तर दृष्टी विचलित होऊन शिळा खाली कोसळण्याचा धोका होता. पोटांत जाईल तेवढा वायू भक्षण करीत राहिला. देहातील रक्तमांस आटुन गेले. हाडांच्या सापळयावर केवळ पापुद्र्यासारखी त्वचा उरली होती. पोटांत अन्न पाणी नसल्यामुळे मल, मुत्र, घाम, घाण निर्माण होण्याचा प्रश्नच नव्हता. शुद्ध देहात सूक्ष्म रूपाने केवळ आत्मा उरला. हळूहळू देहाभोवती वारूळ तयार झाले. मंत्रजपात एकरूप होऊन गेल्यामुळे वारुळामुळे शिळा दिसावयाची बंद झाल्याचेही कृष्णागराला कळले नाही.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने कोणत्याही कपटमंत्राची बाधा होणार नाही.